**सन २०१५-१६ मध्ये श्री सती अनुसया माता संस्थान, पराडसिंग ता. काटोल, जि. नागपूर येथील पर्यटन विकास कामांना निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: प्रस्ताव २०१५/९/प्र.क्र.८५४/ पर्यटन,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक:- ७ ऑक्टोबर, २०१५.

संदर्भ :- जिल्हाधिकारी,नागपूर यांचे पत्र क्र.जिनिस/का-३७/प्रादे.पर्यटन/का-४/१६०३/२०१५, दि. ४/९/२०१५.

**शासन निर्णय :**

पर्यटनस्थळांच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत सन २०१५-१६ मध्ये मासिक निधी वितरण प्रणालीप्रमाणे नोव्हेंबर, २०१५ अखेर रु.११०.२५ कोटी वितरणास उपलब्ध आहेत. सदर निधीतून सप्तश्रृंगीगड वणी येथील कामासाठी रु.१५.०० कोटी वितरीत केले असून उर्वरित रु.९५.२५ कोटीतून (रुपये ११०.२५ कोटी वजा रुपये १५ कोटी) रु.४०.०० लक्ष इतका निधी जिल्हाधिकारी, नागपूर यांना खालील नमूद केलेल्या कामांना प्रशासकीय मान्यता देऊन निधी उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देत आहे.

**(रु.लाखात)**

| जिल्हा | कामाचे नाव | अंदाजित किंमत | वितरीत निधी |
|---|---|---|---|
| १ | मल्टीयुटीलिटी हॉल ला कॉस्टिक ट्रिटमेंट करणे | १५८.०० | ४०.०० |
| २ | कुलिंग सिस्टीम | १८.०० | |
| ३ | सल्लागार फी ४ % | ७.०४ | |
| ४ | आकस्मितता | ७.०४ | |
| | **एकूण** | **१९०.०८** | **४०.००** |

प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत सन २०१५-१६ साठी मासिक निधी वितरण प्रणालीप्रमाणे उपलब्ध असलेल्या रु.११०.२५ कोटी एवढ्या तरतूदीतुन रु.४०.०० लक्ष (रुपये चाळीस लक्ष फक्त) इतकी रक्कम जिल्हाधिकारी, नागपूर या शासन निर्णयान्वये अदा करण्यास शासन खालील अटींना अधीन राहून मंजूरी देत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ / संबंधित जिल्हधिकारी यांची राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही. तसेच कार्यान्वयीन यंत्रणा पूर्वीच्या आदेशात नमूद केल्या प्रमाणेच राहील.

३) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च ३१ मार्च, २०१६ पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

४) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

५) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र ५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंत करण्यात यावी.

६) तांत्रिक मान्यता विहित स्तरावर घेण्यात यावी.

७) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

८) योजनेतर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

९) सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या

संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान / संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही, याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणाऱ्या सर्व सुविधा तसेच पर्यटनस्थळ सर्व नागरिकांसाठी खुले राहील, अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

१०) सदर निधीतून होणाऱ्या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यात शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

११) सदर काम पूर्ण झाल्यानंतर सदर कामाच्या देखभालाची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम व संबंधीत संस्था यांची राहील.

१२) प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थस २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/४/२०१५ मधील परिच्छेद ७ ते १८ मधील अट क्रमांक ७-अ, ७-ब मुळ प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली असून सन २०१५-१६ मध्ये अर्थसंकल्पीत तरतूद उपलब्ध आहे. अट क्र. ८ च्या अटी प्रमाणे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उप विभाग एक अ.क्र.२७ नियम क्र.१४९ नुसार प्रशासकीय विभागाला पुर्ण अधिकार आहेत. अट क्र. ९ प्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाले आहे. तसेच अट क्र. १४ प्रमाणे मुळ प्रस्तावास मंत्रीमंडळाची मान्यता घेण्यात आली आहे. तसेच परिशिष्ट मधील तपासणी सूचीतील अ.क्र. १,२ व ३ ची पुर्तता करण्यात आली आहे. अ.क्र. ४ बाबत स्पष्ट करण्यात येते की, लेखापरीक्षक / महालेखापाल यांचे कोणतेही गंभीर अक्षेप नाहीत. तसेच इतर अट क्र. ५ ते ११ या प्रकरणी लागू होत नाहीत.

१३) वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०१५-१६ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष "मागणी **क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना**, (०२) (१८) **पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरिता अनुदान (३४५२ १९५ ८) ३१ सहाय्यक अनुदाने"** या लेखा शिर्षाखाली मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत) सहाय्यक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरिता सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी/

जिल्हा नियोजन अधिकारी, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व जिल्हाधिकारी, नागपूर यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम जिल्हा कोषागार कार्यालय, मुंबई उपनगरे येथे देयक सादर करुन संबंधितांना रक्कम वितरीत करण्यात यावी.

१४)हा शासन निर्णय, वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थस-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/४/२०१५ तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उप विभाग एक अ.क्र.२७ नियम क्र.१४९ प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१५) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सांकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५१००८१४४१४२६०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ravindra
Laxmikant
Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=421202, st=Maharashtra, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2015.10.08 14:43:51 +05'30'

**( र.ल.लखोटे )**

**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
२) महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
३) महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई,
४) जिल्हाधिकारी, नागपूर,
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई,
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९) नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई,
१०) वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई,
११) अवर सचिव पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई,
१२) निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

***